**राज्य माहिती आयुक्त, नाशिक विभाग यांचेकरिता भाडेतत्वावर घेतलेल्या वाहनाच्या खर्चास मंजूरी देणेबाबत**

**महाराष्ट्र शासन,**
**सामान्य प्रशासन विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक-रामाआ-२०११/१०३२/प्र.क्र. ४७१ /सहा**
**मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,**
**दि. ३/११/२०११**

पहा- राज्य माहिती आयोगाचे पत्र क्रमांक- मुमाआ/वाहन /२०१०/प्रक्र१११/०१,
दि.२४/८/२०११ व २८/९/२०११.

**शासन निर्णय -**

राज्य माहिती आयुक्त, नाशिक विभाग यांचेकरीता शासकीय वाहन उपलब्ध नसल्याने जिल्हाधिकारी नाशिक कार्यालयामार्फत मेसर्स कोकीळ टूर्स ॲन्ड ट्रॅव्हलस , नाशिक या दर करार कंपनीकडून पुढे नमूद केलेल्या कालावधीसाठी त्यांच्याकरीता भाडेतत्वावर वाहन उपलब्ध करुन घेण्यात आले होते.

| अ.क्र. | महिना | देयक रक्कम |
|---|---|---|
| १ | नोव्हेंबर २०१० | रु.१९,३६२/- |
| २ | फेब्रुवारी २०११ | रु.२६,३११/- |
| ३ | मार्च २०११ | रु.२६,४०५/- |
| | एकूण | रु.७२,०७८/- |

वर नमूद केल्याप्रमाणे उपलब्ध करुन देण्यात आलेल्या भाडे तत्वावरील वाहनाकरिता झालेल्या रु.७२,०७८/- ( अक्षरी रु.बहात्तर हजार अठ्याहत्तर फक्त) इतक्या खर्चास याद्वारे एक विशेष बाब म्हणून शासनाची मंजूरी देण्यात येत आहे.

२. या बाबीवरील खर्च " मागणी क्र ए-४ लेखाशिर्ष २०७०- इतर प्रशासकीय सेवा ८०० इतर खर्च (००) (०९) राज्य माहिती आयोग कार्यालय (२०७०००७८२) - १३ कार्यालयीन खर्च "या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा व सन २०११-१२ करिता मंजूर असलेल्या तरतूदीतून भागविण्यात यावा.

३. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.७२३/११/व्यय-४ दि.१७/१०/२०११ अन्वये प्राप्त झालेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

४. हा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संगणक संकेतांक क्रमांक २०१११११०२१६०२२६००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

**( रा.शि.अरवारी )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रत:-

सचिव, राज्य माहिती आयोग, महाराष्ट्र राज्य, मुंबई
महालेखापाल ( लेखा व अनुज्ञेयता ) महाराष्ट्र-१, मुंबई
महालेखापाल ( लेखा व अनुज्ञेयता ) महाराष्ट्र-२, नागपूर
महालेखापाल ( लेखापरिक्षा ) महाराष्ट्र-१, मुंबई.
महालेखापल ( लेखापरिक्षा) महाराष्ट्र-२ नागपूर,
जिल्हा कोषागार अधिकारी, नाशिक
उपसचिव, राज्य माहिती आयोग, नाशिक
वित्त विभाग, व्यय-४
सामान्य प्रशासन विभाग, का-२५
निवडनस्ती कार्यासन -सहा.

C:\Documents and Settings\Valued Acer Customer\Desktop\milind/G.R.